**सन २०१८-१९ या वर्षात राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे या योजनेकरीता अर्थसंकल्पीत तरतूदीस प्रशासकीय (वित्तीय मान्यतेसह) मान्यता व मंजूर निधी वितरणास मान्यता देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८२/३अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १९ ऑक्टोबर, २०१८

**वाचा-**

१) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्र. शेविदौ - ४२०७/ प्र.क्र. १४५/३अे, दि. ६ जून, २००७
२) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्र. शेविदौ - ४२११/ प्र.क्र. ३८/३अे, दि. ९ मार्च, २०११
३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस - २०१४/प्र.क्र. ८२/भाग-३/उद्योग-४, दि. ३०.१०.२०१५
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८
५) कृषि व पदुम विभाग, शासन पत्र क्र.संकीर्ण - २०१८/प्र.क्र.८२/३अे,दि.१५.९.२०१८
६) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र. शेमासे/१८-१९/सीआर-०३/शेविअदौ/मासु/विप्र-६/५३१, दि. ०१.१०.२०१८

**प्रस्तावना-**

राज्यातील शेतकऱ्यांना विविध प्रगत देशातील विकसीत आणि आधुनिक तंत्रज्ञानाची माहिती होण्यासाठी तसेच शेतमालाची निर्यात / कृषि मालाचे पणन व बाजारपेठेतील मागणी, कृषि माल प्रक्रिया याबरोबरच त्या देशांमध्ये उपयोगात येत असलेले अद्ययावत तंत्रज्ञान अवगत करुन त्याचा वापर राज्यातील शेतकऱ्यांनी त्यांच्या शेतावर/शेतीमध्ये करण्यासाठी सहाय्य करणे, विविध देशांनी विकसीत शेती तंत्रज्ञान व अनुषंगिक बाबी यांची माहिती त्या देशातील शेतकऱ्यांशी प्रत्यक्ष चर्चा करुन तसेच क्षेत्रिय भेटी, संबंधित संस्थांना भेटी इत्यादीद्वारे शेतकऱ्यांचे ज्ञान आणि क्षमता उंचावण्याकरीता कृषि विभागाकडून राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे आयोजित करण्यात येतात. तदनुसार सन २००४-२००५ पासून सदर योजना सुरु आहे.

सन २०१८-१९ मध्ये राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे योजना राबविण्यासाठी रु.५०.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने सदर निधीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब व वित्त विभागाच्या दि. २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार मंजुर तरतुदीच्या ७० % म्हणजेच रु.३५.०० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तदनुसार शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

१ सन २०१८-१९ मध्ये राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे ही योजना राबविण्यासाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु. ५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) एवढया निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२ शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थसंकल्प-३, दि.२.४.२०१८ नुसार सदर योजनेसाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु. ५०.०० लक्ष एवढया तरतुदीपैकी ७०% निधी म्हणजेच रु. ३५.०० लक्ष (रुपये पस्तीस लक्ष फक्त) आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३ या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१८-१९ मध्ये मंजुर झालेल्या अनुदानातुन खालील लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी-३**

**२४०१ - पीक संवर्धन**

**१०९ विस्तार व प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजना)**

**१०९ (०१) (३९) शेतक-यांचे देशाबाहेरील अभ्यास दौरे**

**(२४०१ ४३६५) ३३ -अर्थसहाय्य**

४ या आदेशाअन्वये वितरीत करण्यात आलेला निधी कोषगारातून आहरित करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण) तथा राज्य नोडल अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

५ सदर योजनेतंर्गत निवीदा प्रक्रिया राबविण्यास दि.१५.९.२०१८ च्या शासन पत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार आयुक्त (कृषि) यांनी तात्काळ कार्यवाही सुरु करावी. निविदा प्रक्रिया करताना शासन निर्णय , उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-३/उद्योग-४, दि. ३०.१०.२०१५ मधील तरतुदी तसेच शासनाचे प्रचलित नियम व आदेश/तरतुदी विचारात घेण्यात याव्यात. तसेच या आदेशान्वये सदर योजनेसाठी वितरीत करण्यात आलेला निधी दि. ३१.०३.२०१८ पूर्वी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

६ संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीबाबत संदर्भाधीन शासन निर्णय व पत्रे तसेच वित्त विभागाच्या दि. २.४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचना विचारात घेऊन शेतकऱ्यांचे विदेश अभ्यास दौरे प्रक्रिया तात्काळ सुरु करवी.

७ सदर योजनेचा प्रसार/प्रचार/जाहिरात प्रसिद्धी, बुकलेटस छपाई, भित्तीपत्रके छपाई, योजनेंतर्गत निविदा प्रसिद्धी व त्या अंतिम करणे, योजनेचे मूल्यमापन करुन अहवाल तयार करणे, योजना अंमजबजावणीसाठी लेखन सामुग्री खरेदी इ. करिता एकूण उपलब्ध निधीच्या १% इतका निधी आकस्मिक निधी म्हणून खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८ परदेश अभ्यास दौऱ्यातील शेतकऱ्यांची निवड पारदर्शक असावी व निवडीमध्ये पुनरावृत्ती नसावी. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी दक्षता घ्यावी.

९ संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि. २.४.२०१८ मधील अटींचे अनुपालन करावे.

१० संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र पुढील निधी वितरीत करण्यापूर्वी शासनास सादर करावे.

११ संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी शेतकरी विदेश अभ्यास दौऱ्यानंतर निधी विनियोग उपयोगिता प्रमाणपत्रे, शिल्लक निधी तपशील तसेच या योजनेचा फलनिष्पत्ती/मूल्यमापन अहवाल कृषि आयुक्तालयातील संनियंत्रण व मूल्यमापन कक्षामार्फत शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी..

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१७३९०४३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2018.10.19 17:42:36 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त (कृषि) , कृषि आयुक्तालय,पुणे
५) संचालक ( विस्तार व प्रशिक्षण ) तथा राज्य नोडल अधिकारी कृषि आयुक्तालय,पुणे
६) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
११) सर्व तालुका कृषि अधिकारी,
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१३) महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१४) वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
१५) नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
१६) कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (कार्यासन-३अे).